**म्हाडाच्या गोरेगाव सिध्दार्थ नगर (पत्राचाळ) सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या प्रलंबित पुनर्विकासाबाबत उपाययोजना सूचविण्यासाठी नेमलेल्या समितीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक:-बैठक-२०१६/प्र.क्र.०४/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-१६ ऑक्टोबर, २०२०.

वाचा :-१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. वाटप-२०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि.२८/०३/२०१८
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. बैठक-२०१६/प्र.क्र.०४/गृनिप, दि.१६/०१/२०२०
३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. बैठक-२०१६/प्र.क्र.०४/गृनिप, दि.१२/०२/२०२०
४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. बैठक-२०१६/प्र.क्र.०४/गृनिप, दि.२४/०७/२०२०
५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र. बैठक-२०१६/प्र.क्र.०४/गृनिप, दि.०२/०९/२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाच्या (म्हाडा) अखत्यारितील गोरेगाव (पश्चिम), मुंबई येथील सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या (पत्राचाळ) पुनर्विकासाच्या अनुषंगाने वाचा क्र.२ येथील शासन निर्णय, दि.१६/०१/२०२० अन्वये, पुढील १५ दिवसांमध्ये शासनास उपाययोजना सुचविण्यासाठी श्री. जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली एक सदस्यीय समिती नियुक्त करण्यात आली आहे. तथापि, सदरहू समितीचा अहवाल अद्यापही अप्राप्त आहे. सदरहू समितीकडे संबंधितांनी त्यांचे म्हणणे सादर करण्यासंदर्भात केलेली मागणी विचारात घेऊन सदरहू समितीस वाचा क्र.३ येथील शासन निर्णय, दि.१२/०२/२०२० अन्वये, १५ दिवसांची मुदतवाढ देण्यात आलेली आहे. राज्यात / संपूर्ण देशात उद्भवलेल्या कोरोना साथीमुळे लॉकडाऊन (टाळेबंदी) करण्यात आली होती व ती अद्यापही पूर्णत: उठविण्यात आलेली नसल्याने टाळेबंदी शिथिल करण्यात वा उठविण्यात आल्यापासून एक सदसीय समितीस किमान ३० दिवसांची मुदतवाढ देण्याची विनंती समितीने शासनास केली होती. त्यास अनुसरुन वाचा क्र. ४ येथील शासन निर्णय, दि.२४/०७/२०२० अन्वये समितीस दि.०१/०७/२०२० पासून ३० दिवसांची मुदतवाढ देण्यात आलेली आहे. राज्यात संपूर्णत: टाळेबंदी उठलेली नसल्याने कार्यालयातील कर्मचाऱ्यांची मर्यादीत उपस्थिती विचारात घेता, या समितीस अहवाल सादर करण्याकरीता वाचा क्र.०५ येथील शासन निर्णय, दि.०२/०९/२०२० अन्वये दि.०१/०८/२०२० ते दि.३०/०९/२०२० पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

प्राधिकरणाने नियुक्त केलेल्या वरिष्ठ विधीज्ञ तसेच शासकीय महाअभियोक्ता यांचेशी म्हाडाच्या हिश्यामधील निवासस्थाने तसेच पुनर्विकासाकरीता आवश्यक असलेली निवासस्थाने प्राप्त होण्याच्या अनुषंगाने सल्लामसलत करुन उपाययोजना सुचविण्याकरीता समितीस शासनास अहवाल सादर करण्यास किमान २ महिन्यांची मुदतवाढ देण्याची विनंती समितीने शासनास केली आहे. त्यास अनुसरुन सदरहू एक सदस्य समितीस अंतिम/शेवटची मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोरेगाव, मुंबई येथील पत्राचाळ वसाहतीमधील सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या पुनर्विकास प्रकल्पासंदर्भात उपाययोजना सुचविण्यासाठी वाचा येथील दि.१६/०१/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री. जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या एक सदस्यीय समितीस दि.०१/१०/२०२० ते दि.३०/११/२०२० पर्यंत अहवाल सादर करण्यास २ महिन्यांची अंतिम /शेवटची मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२०१०२०१३१९४५७९०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bharose M U

Digitally signed by Bharose M U
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3abf3ab8b16dfec487f18ce64d6b0ab8e38d8925d44d15f7dbd61babb4ae6df, cn=Bharose M U
Date: 2020.10.28 16:01:30 +05'30'

**( मुं. उ. भरोसे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५) श्री. जॉनी जोसेफ, सेवानिवृत्त मुख्य सचिव तथा अध्यक्ष, एक सदस्यीय समिती, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई
६) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, (म्हाडा), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
७) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
८) उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (गृनिप).